**नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या" अंमलबजावणीची कार्यपध्दती**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय, क्रमांक : अंनियो १००७/१८/सेवा- ४
मंत्रालय, मुंबई - ४०० ३२, दिनांक ७ जुलै २००७

**वाचा :** - शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो १००५/१२६/सेवा -४, दि. ३१ ऑक्टोबर २००५

## निर्णय

### प्रस्तावना

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :अंनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोबर २००५ अन्वये राज्य शासनाने १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना अंमलात आणली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीच्या प्रयोजनार्थ हे राज्य शासन केंद्र शासनाच्या नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेमध्ये सहभागी होईल असा निर्णय घेण्यात आला आहे.

२. केंद्र शासनाने असे जाहीर केले आहे की, या योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (Central Record Keeping Agency) व अनेक निवृत्तिवेतन निधी व्यवस्थापक नियुक्त केले जातील. तथापि केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण, निधी व्यवस्थापक इत्यादींच्या नियुक्तीबाबतचा प्रश्न अद्यापही केंद्र शासनाच्या विचाराधीन आहे.

३. वरील परिस्थिती लक्षात घेता, केंद्र शासनाकडून केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण व निवृत्तिवेतन निधी व्यवस्थापक यांच्या नियुक्त्यांसह परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेबाबतचा पूर्ण आराखडा स्थापित होईपर्यंत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणीसाठी अंतरिम व्यवस्था करण्याबाबतचा प्रश्न राज्य शासनाच्या विचाराधीन होता.

### शासन निर्णय

४. शासन आता असा निर्णय घेत आहे की, केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाची स्थापना होईपर्यंत वरील योजनेची अंमलबजावणी, राज्य शासनाच्या सेवेत तसेच जिल्हा परिषदा व ज्यांना सध्याची निवृत्तीवेतन योजना (महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२) लागू होती, अशा मान्यता प्राप्त व अनुदानित प्राथमिक व माध्यमिक शाळा, कृषित्तर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय महाविद्यालये तसेच कृषि विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित अनुदानित महाविद्यालये इत्यादींच्या सेवेत १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांबाबतीत, करण्यासाठी एका स्वतंत्र राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाची स्थापना करण्यात येईल. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसंबंधीचे लेखे व इतर संबंधित अभिलेख यांची देखभाल करेल. परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणीसाठी, खालील कार्यपध्दती विहीत करण्याचा निर्णय देखील घेण्यात आला आहे.

५. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई यांच्या प्रशासकीय अधिपत्याखाली कार्य करेल.

६. या योजनेअंतर्गत करावयाच्या वजावटीसंबंधात खालील सर्वसाधारण सूचनांचे पालन केले जावे.:-

(अ) नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना १ नोव्हेंबर,२००५ पासून अंमलात आली आहे.

(ब) या योजनेतील **स्तर-१** अंतर्गत कर्मचाऱ्याकडून देय ठरणारे अंशदान म्हणजे **मूळ वेतन अधिक महागाई वेतन (असल्यास)अधिक महागाई भत्ता या रकमेच्या १०%** इतकी रक्कम (रुपयाच्या अपूर्णांकात असलेली रक्कम पुढील रुपयात

पूर्णांकित करुन) १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतन देयकातून प्रत्येक महिन्यात वसुल केली जाईल.

**(क)** या योजनेतील **स्तर-२** अंतर्गत स्वेच्छेने जमा करावयाच्या अंशदानांबाबतची योजना पुढील आदेश दिले जाईपर्यंत लागू ठरणार नाही व म्हणून याबाबतची स्वेच्छेने करावयाची अतिरिक्त वसुली कर्मचाऱ्यांच्या वेतनातून करण्यात येऊ नये.

**(ड)** कर्मचाऱ्याचे अंशदान वसुल करण्याची कार्यवाही तो ज्या महिन्यात नियुक्त झालेला असेल त्याच्या पुढील महिन्याच्या वेतनातून सुरु करण्यात यावी. (उदा. जर एखादा कर्मचारी ऑगस्ट, २००७ मध्ये नियुक्त झाला असेल तर या योजनेतंर्गत त्याच्या अंशदानाची वसुली त्याच्या सप्टेंबर, २००७ या महिन्याच्या वेतनातून सुरु करण्यात यावी. )

**(इ)** १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांना सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू नसल्यामुळे त्यांच्या वेतनातून सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी संदर्भातील अंशदानांची वसुली करण्यात येणार नाही.

**<u>अंमलात आणावयाची कार्यपध्दती</u>**

७. आहरण व संवितरण अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/कोषागार अधिकारी यांनी खालील परिच्छेदांमध्ये विहीत केलेल्या कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करावे.

**<u>कर्मचाऱ्यांकडून माहिती प्राप्त करणे.</u>**

८. शासकीय विभाग/कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी प्रत्येक कर्मचाऱ्याकडून, त्याच्या/तिच्या नियुक्तीनंतर लगेच, निवृत्तिवेतन लेखा क्रमांक प्राप्त करण्याचा अर्ज, विहीत **<u>नमुना- १</u>** मध्ये तीन प्रतीत प्राप्त करील आणि त्या तीनही प्रती राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाकडे थेट पाठविल. जे कर्मचारी १ नोव्हेंबर, २००५ ते या आदेशाचा दिनांक यामधील कालावधीत नियुक्त झालेले असतील त्यांचा नमुना-१ मधील अर्ज सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी प्राप्त करावा आणि राज्य देखभाल अभिलेख अभिकरणाकडे दि १५ ऑगस्ट, २००७ पूर्वी न चुकता पाठविण्याची दक्षता घ्यावी. नमुना- १ खालील वचनपत्रावर संबंधित कर्मचाऱ्याने स्वाक्षरी केलेली आहे, याची खातरजमा आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी करुन घ्यावी.

**<u>राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने निवृत्तीवेतन लेखा क्रमांक देणेबाबत</u>**

९. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, प्रत्येक कर्मचाऱ्यास एक निवृत्तीवेतन लेखा क्रमांक देईल व तो **<u>नमुना-१</u>** च्या सर्व प्रतींवर नोदविण्यात येईल. या नमुन्याची एक प्रत राज्य अभिलेख देखभाल अभिकरण ठेवून घेईल. तद्नंतर राज्य अभिलेख देखभाल अभिकरण **<u>नमुना १</u>** ची दुसरी व तिसरी प्रत संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांना परत पाठविल. प्रत्येक आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित कर्मचाऱ्यास त्याचा निवृत्तीवेतन लेखा क्रमांक कळविणे आवश्यक आहे. सदरहू नमुन्याची एक प्रत कर्मचाऱ्याच्या सेवापुस्तकातदेखील चिकटविण्यात यावी. नमुन्याची तिसरी प्रत संबंधित कर्मचाऱ्याच्या वैयक्तिक नस्तीत ठेवण्यात यावी. <u>एकदा दिलेला निवृत्तीवेतन लेखा क्रमांक, संबंधित कर्मचारी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या अन्य कार्यालयात बढतीने अथवा बदलीने स्थानांतरीत झाल्यानंतरही बदलणार नाही.</u> या क्रमांकाची नोंद संबंधित कर्मचाऱ्याच्या वेतन देयक नोंदवहीमध्ये संबंधित कर्मचाऱ्याच्या नावासमोर घेण्यात यावी.

१०. निवृत्तीवेतन लेखा क्रमांकात दोन घटक असतील. ते म्हणजे (अ) पहिल्या नियोक्त्याचा संकेतांक व (ब) कर्मचाऱ्याचा संकेतांक

११. पहिल्या नियोक्त्याचा संकेतांक खाली दर्शविल्याप्रमाणे अकरा अंकांचा असेल.

**(i)** **<u>पहिला अंक</u>** संस्थेचा प्रकार दर्शवेल,

| | |
|---|---|
| शासकीय कर्मचाऱ्यांसाठी | ------ १ |
| जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांसाठी | ------ २ |
| मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय प्राथमिक शाळांसाठी | ------ ३ |
| मान्यता प्राप्त व अनुदानित माध्यमिक शाळांसाठी | ------ ४ |
| कृषित्तर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय महाविद्यालयांसाठी | ------ ५ |
| कृषि विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित अनुदानित महाविद्यालयांसाठी | -------६ |

**(ii)** **<u>पुढील चार अंक</u>** कोषागार/उपकोषागार यांचा संकेतांक दर्शवतील.

**(iii)** **<u>पुढील सहा अंक</u>** आहरण व संवितरण अधिकाऱ्यांचा संकेतांक दर्शवतील.

१२. कर्मचाऱ्याचा संकेतांक कमाल १२ अंकाचा असेल आणि तो राज्य अभिलेख देखभाल अभिकरण निश्चित करेल. हा संकेतांक कर्मचाऱ्याच्या संकेतांकाशी समान असेल आणि तो सर्व सेवा/वेतन प्रकरणांसाठी **"सेवार्थ"** (वेतन देयके तयार करण्यासाठी संगणकीकृत आज्ञावली) मध्ये उपयोगात आणला जाईल.

१३ राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, निवृत्तीवेतन लेखा क्रमांक दिलेल्या कर्मचाऱ्यांचा तपशील **नमुना आर-१** मध्ये ठेवण्यात आलेल्या नोंदवहीमध्ये नमूद नोंदविल.

**अंशदानाची वसुली**

**१४.** अंशदानाची वसुली माहे सप्टेंबर, २००७ च्या वेतनातून (जे ऑक्टोंबर, २००७ मध्ये देय ठरेल) सुरु करण्यात यावी. या प्रयोजनार्थ प्रत्येक आहरण व संवितरण अधिकारी १ नोव्हेंबर,२००५ रोजी किंवा त्यांनतर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांसह सर्व कर्मचाऱ्यांसाठी नियमित नमुन्यात वेतन देयक तयार करेल. या वेतन देयकासोबत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेतंर्गत वसुल करण्यात येणाऱ्या अंशदानाची कर्मचारीनिहाय वसुली दर्शविणारे स्वतंत्र विवरणपत्र **(नमुना-२ मध्ये)** जोडण्यात येईल. **नमुना- २** मधील अनुसूचीच्या दोन प्रती अशा प्रत्येक देयकासोबत न चुकता जोडण्यात याव्यात. वेतन देयकाच्या (महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्रमांक १९, नियम २५९ (१)),दर्शनी बाजूवर, अशा वजावटी (बी) स्तंभ २२ खाली कोषागाराकडून समायोजित करण्यात येणाऱ्या वजावटी - इतर वजावटी" या खाली दर्शविण्यात याव्यात व त्याबाबत, "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत कर्मचाऱ्यांच्या अंशदानासंबंधातील वजावटी" असे नमूद करण्यात यावे. आहरण व संवितरण अधिकारी असे सर्व कर्मचाऱ्यांसंबंधीचे एकत्रित वेतन देयक संबंधित उप कोषागार/कोषागार यांचेकडे नेहमीच्या पध्दतीने सादर करील. कर्मचाऱ्याचे अंशदान खालील लेखा शीर्षाखाली जमा करण्यात यावे. :-

"८३४२ - इतर ठेवी,
१२० - संकीर्ण ठेवी,
(००) (०४) - परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना,
शासकीय कर्मचाऱ्याचे अंशदान, स्तर १ (८३४२-५०८-१)"

**प्रतिनियुक्तीवर असलेले शासकीय कर्मचारी**

१५. स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर असलेल्या कर्मचाऱ्यांच्याबाबतीत, त्याला ज्या संस्थेने प्रतिनियुक्तीवर पाठविलेले असेल त्या संस्थेच्या कार्यालय प्रमुखाने राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाकडून त्या कर्मचाऱ्याचा निवृत्तीवेतन लेखा क्रमांक प्राप्त करावा व तो क्रमांक स्वीयेत्तर नियोक्त्यास कळवावा. स्वीयेत्तर नियोक्त्याने कर्मचाऱ्याच्या अंशदानाच्या रकमेची वसुली मासिक वेतन देयकामधून करावी आणि अशी वसूल केलेली रक्कम **नमुना- २** च्या दोन प्रती चलनास जोडून त्याव्दारे कोषागारात जमा करावी. कर्मचाऱ्याच्या अंशदानाची रक्कम, वरील परिच्छेद क्रमांक १४ मध्ये दर्शविलेल्या प्रधान शीर्षाखाली जमा करावे. त्याचप्रमाणे स्वीयेत्तर नियोक्त्याने स्वतंत्र चलनाव्दारे नियोक्त्याचे समतुल्य अंशदान भरावे. स्वीयेत्तर नियोक्त्याने त्यांचे अंशदानाच्या रकमा खालील लेखा शीर्षाखाली जमा कराव्यात. :-

"८३४२ - इतर ठेवी,
१२० - संकिर्ण ठेवी,
(००) (०५) - परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना,
शासनाचे अंशदान, स्तर १ (८३४२-५०९-९)

**१ नोव्हेंबर, २००५ पासुन सुरु झालेल्या मागील कालावधीची वसुली**

१६. कर्मचारी ज्या महिन्यात नियुक्त झालेला असेल त्याच्या पुढील महिन्यापासून करावयाची कर्मचाऱ्याच्या अंशदानाच्या थकबाकीची वसुली समान मासिक हप्त्यांमध्ये, नियमित मासिक अंशदानाच्या वसुलीसोबत, करण्यात यावी, म्हणजेच एका महिन्याची अंशदानाची थकबाकी त्या महिन्यातील अंशदानाच्या नियमित हप्त्यासोबत केली जावी. प्रत्येक महिन्याच्या अंशदानासाठी स्वतंत्र अनुसूच्या जोडण्यात याव्या. प्रत्येक कर्मचाऱ्याच्याबाबतीतील अंशदानाची सर्व थकबाकी पूर्णपणे वसुल होईपर्यंत अशा प्रकारे अंशदानांच्या दोन हप्त्यांची वसुली सुरु ठेवण्यात यावी.

<u>उदा.</u> जर कर्मचाऱ्याची नियुक्ती १० नोव्हेंबर, २००५ रोजी करण्यात आलेली असेल तर त्याच्या अंशदानाची वसुली खालील प्रमाणे करण्यात येईल.:-

i) **<u>ऑक्टोबर, २००७ मध्ये दिल्या जावयाच्या वेतनासाठी</u>** - माहे सप्टेंबर, २००७ चे अंशदान (जे ऑक्टोबर, २००७ मध्ये दिले जाणार आहे) <u>अधिक (+)</u> माहे डिसेंबर, २००५ च्या अंशदानाची वसुली.

ii) **<u>नोव्हेंबर, २००७ मध्ये दिल्या जावयाच्या वेतनासाठी</u>** - माहे ऑक्टोबर, २००७ चे अंशदान (जे नोव्हेंबर, २००७ मध्ये दिले जाणार आहे ) <u>अधिक (+)</u> माहे जानेवारी,२००६ च्या अंशदानाची वसुली.

**<u>अधिदान व लेखा अधिकारी/कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी यांनी वेतन देयकास मान्यता देणेबाबत</u>**

**१७.** जर वेतन देयक सर्व दृष्टीने परिपूर्ण असेल तर संबंधित अधिदान व लेखा अधिकारी/कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी यांनी ते संमत करावे व विहित लेखा शीर्षाखाली (जोडपत्र 'अे' मध्ये दर्शविलेल्या) वसुलीची रक्कम प्राप्त झाल्याचे दर्शवावे. त्यांने (उपकोषागार अधिकारी वगळून) **<u>नमुना २</u>** नुसार असलेल्या अनुसूचीची एक प्रत वेतन देयकापासून काढून घ्यावी व **<u>नमुना- आर-२</u>** मध्ये एकत्रित माहिती तयार करावी व ती माहिती **<u>नमुना- २</u>** मधील सर्व अनुसूचींसोबत राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाकडे पाठवावी. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण **<u>नमुना -आर- २</u>** मध्ये दर्शविल्यानुसार संबंधित रकमा प्रत्येक कर्मचाऱ्याच्या खात्यात जमा करेल. याबाबतच्या सविस्तर सूचना या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या **<u>जोडपत्र अे</u>** मध्ये देण्यात आलेल्या आहेत. त्यांचे काटेकोरपणे पालन केले जावे. जेथे शक्य असेल तेथे आहरण व संवितरण अधिकाऱ्याने **<u>नमुना- २</u>** व **<u>नमुना-आर-२</u>** इलेक्ट्रॉनिक पध्दतीने तयार करावे व त्या मुद्रित प्रतींवर स्वाक्षरी करुन त्या अनुक्रमे राज्य अभिलेख देखभाल अभिकरण व कोषागारे यांच्याकडे पाठवाव्यात.

**<u>राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने माहितीचे एकत्रिकरण करणेबाबत</u>**

**१८.** अधिदान व लेखा अधिकारी/कोषागार अधिकारी यांचेकडून प्राप्त झालेल्या माहितीची नोंद, राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाकडून **<u>नमुना-आर-३</u>** नुसार ठेवण्यात आलेल्या नोंदवहीमध्ये घेतली जाईल. एकुण प्राप्त रकमांचा मेळ घातल्यानंतर राज्य अभिलेख देखभाल अभिकरण एक देयक अधिदान व लेखा अधिकाऱ्याकडे शासनाच्या अंशदानाच्या रकमा जमा करण्याच्या कार्यवाहीसाठी पाठवेल. सर्व संबंधित शासकीय कर्मचाऱ्यांच्या एकूण रकमासंबंधी एक देयक तयार करण्यात येईल. या देयकात ज्या कर्मचाऱ्यांच्या रकमा जमा करावयाच्या आहेत त्यांची यादी अंतर्भूत करण्याची आवश्यकता नाही. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण केवळ देयकात दर्शविण्यात आलेली रक्कम अचूक /बरोबर आहे, असे प्रमाणित करेल. याशिवाय समतुल्य रक्कम खाली दर्शविण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली जमा करण्यासाठी एक चलन उपरोक्त देयकासोबत जोडण्यात येईल. अशारितीने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना पाठविणात येणारे देयक "निरंक" रकमेचे असेल.

प्रधान शीर्ष - "८३४२ - इतर ठेवी,
१२० - संकिर्ण ठेवी,
(००) (०५) - परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना,
शासनाचे अंशदान, स्तर १.(८३४२-५०९-९)"

**१९.** परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजनेअंतर्गत राज्य शासनाकडून दयावयाच्या समतुल्य अंशदानाबाबतचा खर्च खालील शीर्षाखाली दर्शविण्यात यावा.:-

मागणी क्रमांक जी - ६
प्रधान शीर्ष "२०७१ निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ति लाभ
०१ - नागरी
११७ - परिभाषित निवृत्तिवेतन योजने अतंर्गत शासनाचे अंशदान
०१- शासनाचे अंशदान
(०१) (०४) निवृत्तीवेतनावरील खर्च (२०७१०६४२)
०४, निवृत्तिवेतन विषयक खर्च"

H-858-2a

**राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने माहिती अद्ययावत ठेवणेबाबत.**

२०. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण त्याचेकडील माहिती प्रत्येक महिन्यात अद्ययावत करील आणि जमा न झालेल्या रकमा, (miscredits), न जुळणाऱ्या रकमां (mismatches) इत्यादींबाबतचे आक्षेप अहवाल (exception report) तयार करील. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, अधिदान व लेखा अधिकारी/संबंधित कोषागार अधिकारी यांच्यामार्फत संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडून जमा न झालेल्या रकमां (miscredits), न जुळणाऱ्या रकमां (mismatches) इत्यादींबाबतचे माहिती प्राप्त करेल.

**मेळजुळणी**

२१. शासकीय लेख्यांच्या जमा व खर्चाची नियतकालिक मेळजुळणी करण्याची जबाबदारी राज्य अभिलेख लेखा अभिकरणाची असेल.

**अंशदानावरील व्याज**

२२. स्तर-१ अंतर्गत जमा झालेल्या रकमांवरील देय व्याजाचा दर व व्याजाची परिगणना करण्याबाबतची कार्यपध्दती याबाबतच्या सविस्तर सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

**वार्षिक विवरणपत्र**

२३. लाभार्थींच्या वैयक्तिक लेख्यांची देखभाल करण्याचे काम केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे सोपविण्याचे प्रस्तावित आहे. तसे होईपर्यंत प्रत्येक वित्तीय वर्षाच्या अखेरीस राज्य अभिलेख देखभाल अभिकरण **नमुना आर-३** नुसार लेख्याचे विवरणपत्र आहरण व संवितरण अधिकाऱ्यामार्फत प्रत्येक कर्मचाऱ्यास पाठविल. याशिवाय ही माहिती राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाच्या संकेत स्थळावर सुयोग्य परवलीच्या शब्दाचे (password) संरक्षण देऊन ठेवण्यात येईल.

**इतर सूचना**

२४. स्तर १ अंतर्गत जमा झालेल्या एकूण रकमेतून (कर्मचाऱ्याचे अंशदान अधिक नियोक्त्याचे अंशदान अधिक व्याज) कोणतीही रक्कम कर्मचाऱ्याच्या सेवा कालावधीत काढून घेता येणार नाही. तथापि कर्मचाऱ्याचा अकाली मृत्यु झाल्यास अथवा शासकीय कर्मचाऱ्याने सेवात्याग करण्याचा निर्णय घेतल्यास, अशा स्वरुपाच्या प्रकरणी सेवांत लाभ देण्यासंबंधीच्या तरतुदी स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

२५. जेव्हा एखादया कर्मचाऱ्याची एका कार्यालयातून दुसऱ्या कार्यालयात बदली होईल, तेव्हा आहरण व संवितरण अधिकारी त्याच्या शेवटच्या वेतन प्रमाणपत्रात (Last Pay Certificate) निवृत्तीवेतन लेखा क्रमांक, ज्या महिन्यापर्यंत त्या कर्मचाऱ्याचे अंशदान परिभाषित योजनेसाठी जमा करण्यात आलेले असेल तो महिना या बाबी स्पष्टपणे दर्शवेल.

२६. एखादया कर्मचाऱ्याची, परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या त्याच किंवा अन्य विभागात/संस्थेत एखादया पदी नव्याने नियुक्ती झाली तर त्या कर्मचाऱ्यास त्यापूर्वीच देण्यात आलेला निवृत्तीवेतन लेखा क्रमांक बदलणार नाही. नवीन कार्यालयाचा आहरण व संवितरण अधिकारी अशा कर्मचाऱ्याच्या निवृत्तीवेतन लेखा क्रमांकाची व अन्य तपशीलाची नोंद वेतन देयक नोंदवहीमध्ये घेईल व नेहमीच्या पध्दतीने अंशदानाची वसुली करेल.

२७. अनधिकृत अनुपस्थिती, असाधारण रजा इत्यादी प्रकरणी कर्मचाऱ्याच्या अंशदानाची वसुली करण्यात येऊ नये. जर एखादा कर्मचारी देय व अनुज्ञेय रजेवर असेल किंवा निलंबनाधीन असेल व निर्वाह भत्ता घेत असेल, तर अशा प्रकरणी ज्या वेतन देयकाव्दारे अशा कालावधीचे रजा वेतन/निर्वाह भत्ता काढण्यात येत असेल, त्या वेतन देयकातून/निर्वाह भत्त्याच्या देयकातून अंशदानाची नियमित वसुली करण्यात यावी.

**शासकीय विभाग/कार्यालये वगळता अन्य संस्थांसंबंधातील सूचना**

२८. वरील कार्यपध्दती जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय प्राथमिक व माध्यमिक शाळा, कृषित्तर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय महाविद्यालये तसेच कृषि विद्यापीठे इत्यांदीमधील

कर्मचाऱ्यांना योग्य त्या फेरफारांसह लागू राहील. या संस्था प्रत्येक महिन्यात **नमुना -२** मधील माहितीसह (कर्मचाऱ्याच्या अंशदानाइतके) समतुल्य अंशदान राज्य अभिलेख देखभाल अभिकरणास देतील. कर्मचाऱ्याचे अंशदान तसेच संबंधित संस्थेचे अंशदान खालील संबंधित लेखा शीर्षाखाली जमा करण्यात येईल.:-

"८३४२ - इतर ठेवी,

१२० - संकीर्ण ठेवी,

(००)(०६)-परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना,जिल्हा परिषदेचे व त्यांच्या कर्मचाऱ्यांचे अंशदान, स्तर -१ (८३४२-५१०-५)

(०० (०७)-परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना,मान्यता प्राप्त व अनुदानित प्राथमिक शाळांचे व त्यांच्या कर्मचाऱ्यांचे अंशदान स्तर १ (८३४२-५११-४)

(००)(०८)-परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना, मान्यता प्राप्त व अनुदानित माध्यमिक शाळांचे व त्यांच्या कर्मचाऱ्यांचे अंशदान, स्तर १ (८३४२-५१२-३)

(००)(०९)-परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना, कृषित्तर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय महाविद्यालयांचे व त्यांच्या कर्मचाऱ्यांचे अंशदान, स्तर १ (८३४२-५१३-२)

(००)(१०)-परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना, कृषि विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित अनुदानित महाविद्यालयांचे व त्यांच्या कर्मचाऱ्यांचे अंशदान, स्तर १ (८३४२-५१४-१)"

याबाबत स्वतंत्र सूचना संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून देखील निर्गमित करण्यात येतील.

**२९.** सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की त्यांनी हे आदेश त्यांच्या प्रशासकीय अधिपत्याखालील विभाग प्रमुख व दुय्यम कार्यालयांचे प्रमुख यांच्या निदर्शनास सर्वोच्च प्राधान्याने आणावेत. जर वरील कार्यपध्दतीचे पालन करण्यात आले नाही तर अधिदान व लेखा अधिकारी /कोषागार अधिकारी माहे सप्टेंबर, २००७ पासूनची देयके संमत करणार नाहीत आणि परिणामी वेतन देयके समंत करण्यास होणाऱ्या विलंबास संबंधित विभाग जबाबदार राहतील. प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी, वरील परिच्छेद- २८ मध्ये नमूद करण्यात आलेल्या, त्यांच्या अधिपत्याखालील विविध कार्यालयांना/संस्थांना याबाबतच्या सूचना निर्गमित कराव्यात.

**३०.** हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २००७०७०७१३११३१००१ असा आहे.

**३१.** या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

**नसीमा म. शेख**
**शासनाच्या उप सचिव**

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई, (५०० प्रती)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष

उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
(प्रत्येकी १०प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक
(प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्र.३ व ४,
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
(प्रत्येकी २५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ
(प्रत्येकी ५ प्रती),
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य
(प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

*पत्राद्वारे.

**Procedure for the implementation of the new "Defined Contribution Pension Scheme".**

# GOVERNMENT OF MAHARASHTRA

## FINANCE DEPARTMENT

Government Resolution No. CPS 1007/18/SER- 4,
Mantralaya, Mumbai - 400 032, Dated 7 July, 2007

***Read*** *:-Government Resolution Finance Department No. CPS 1005/126/SER 4, dated 31st October, 2005*

## ***RESOLUTION***

## Preamble

The State Government have introduced the new **Defined Contribution Pension Scheme (DCPS)** for the employees who are recruited on or after 1st November, 2005, vide Government Resolution, Finance Department No. CPS 1005/126/SER- 4, dated 31st October, 2005. It has been decided that for the purpose of implementation of the Scheme, this State Government would join the new Defined Contribution Pension Scheme introduced by Government of India.

2. Government of India have declared that in order to implement the scheme, there will be a Central Record Keeping Agency and several Pension Fund Managers. However, the matter regarding establishment of Central Record Keeping Agency, Fund Managers, etc., is still under consideration of Government of India.

3. In view of the above, the question of making an interim arrangement for the implementation of the new Defined Contribution Pension Scheme till the full architecture of the new pension scheme, including the Central Record Keeping Agency and Pension Fund Managers are established by Government of India, was under consideration of the State Government.

## Government Resolution

4. Government is now pleased to decide that pending formation of the Central Record Keeping Agency, a separate **State Record Keeping Agency (SRKA)** will be formed for the above scheme in respect of all employees who are recruited on or after 1 st November, 2005 in the service of State Government as well as in the service of Zilla Parishads, recognized and aided non-Government primary schools & secondary schools, Non-Agricultural Universities and recognized and aided non-Government Colleges affiliated thereto and Agricultural Universities and aided colleges affiliated thereto etc., to whom the earlier pension scheme i.e. Maharashtra Civil Services (Pension) Rules,1982 was applicable. The SRKA will maintain the accounts and other related records in respect of the DCPS. It has also been decided to prescribe the following procedure for the implementation of the DCPS.

5. SRKA will function under the administrative control of Directorate of Accounts and Treasuries, Mumbai.

6. The following general instructions regarding deductions under the scheme be followed :

(a) The new Defined Contribution Pension Scheme has become operational with effect from 1st November, 2005.

H-858(13000+40-7-07)-5

(b) Contributions payable by the employees towards the Scheme under Tier I, i.e. 10% of the Basic Pay + Dearness Pay (if any) + Dearness Allowance, (rounded off to the nearest rupee) will be recovered from the pay bills of the employees who are recruited on or after 1st November, 2005, every month.

(c) The voluntary contributions under Tier-II of this scheme will not be applicable till further orders and therefore no additional voluntary recoveries should be made from the salaries of those employees on this account.

(d) The recovery of employee's contribution should start from the salary for the month following the month of joining service by the employee. ( For example, if an employee joins service in the month of July, 2007, then recovery on account of his contribution under the scheme should start from the salary for the month of August, 2007.).

(e) No recovery will be made towards General Provident Fund contribution from the employees who are recruited on or after 1 st November, 2005, as the General Provident Fund Scheme is not applicable to them.

**Procedure to be followed**

7. The Drawing & Disbursing Officer, Pay & Accounts Officer, Mumbai/Treasury Officer, should carefully follow the procedure laid down in following paragraphs.

**Collection of Information from employees**

8. The Drawing & Disbursing Officers in Government Departments/Offices will obtain an application to obtain pension account number in the prescribed **Form-1** in triplicate from each employee immediately on his/her recruitment and send all the three copies to the SRKA directly. In case of employees recruited during the period from 1st Novermber, 2005 till the date of issue of these orders, the appplication in Form-1 should be collected by all Drawing & Disbursing Officers and sent to the SRKA without fail before 15th August, 2007. It should be ensured that the undertaking below the Form-1 is invariably signed by the concerned employee.

**Allotment of Pension Account number by SRKA**

9. The SRKA will give a Pension Account number to each such employee and note it on all the copies of Form-1. One copy of this Form will be retained by the SRKA. The second and third copy of Form-1 will then be returned to the concerned Drawing & Disbursing Officer by the SRKA. Each Drawing & Disbursing Officer should communicate the Pension Account Number to the concerned employee. One copy of the Form should also be pasted in the Service Book of Employee. The third copy should be kept in the personal file of the concerned employee. The Pension Account Number, once allotted, will not change **even when the employee is promoted or transferred to any other office to which DCPS is applicable.** The entry of this number should also be invariably made in the Pay Bill Register against the name of such employee.

**10.** The Pension Account Number will have two components, i.e. (a) First Employer Code and (b) Employee Code.

**11.** The First Employer Code shall consist of eleven digits as indicated below :-

(i) The first digit will indicate type of Organisation

| | |
|---|---|
| For Government Employees, | ......1 |
| For Z.P. Employees, | ......2 |
| For Recognized & aided non-Government Primary Schools | ...... 3 |
| For Recognized & aided non- Government Secondary Schools | .......4 |
| For Non- Agricultural Universities and recognized - and aided non-Government Colleges affiliated thereto | ......5 |
| For Agricultural Universities and aided colleges affiliated thereto | ......6 |

